**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै.(श्री.) सखाराम गोविंदराव वडवळे, सह. शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.०७/टीएनटी-६**
:MSC-16014/13/2025-MSC-(TNT-6)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २२ मे, २०२५

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. नांदेड यांचे पत्र क्र.शिअप्र/जिपनां/प्रा.१ अ/८३७२/२०२४, दि.१४/११/२०२४
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/ संकीर्ण/००१८/ २०२३, दिनांक ०१/०१/२०२४ व पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/१३७०/२०२५, दि.१०/०३/२०२५

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) सखाराम गोविंदराव वडवळे, सह. शिक्षक केंद्रीय प्राथमिक शाळा, थारा, किनवट जि. नांदेड यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ३०/०८/२०२० रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) वडवळे, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. नांदेड यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै.(श्री.) सखाराम गोविंदराव वडवळे, सह. शिक्षक केंद्रीय प्राथमिक शाळा, थारा, किनवट जि. नांदेड येथे दिनांक १९/०८/२०१८ पासून कार्यरत होते.

४. सहाय्यक जिल्हाधिकारी तथा दंडाधिकारी किनवट यांचे दिनांक ०६/०४/२०२० च्या आदेशानुसार गट शिक्षणाधिकारी,पंचायत समिती, किनवट दिनांक ०७/०४/२०२० रोजीच्या आदेशान्वये, कै. (श्री.) वडवळे यांची कोव्हिड-१९ विषाणूचा प्रादुभार्व व प्रसार रोखणेकामी गावपातळीवर सर्वेक्षण करणेबाबत नियुक्ती

करण्यात आली होती. सदर आदेशाच्या अनुषंगाने कै.(श्री.) वडवळे कोव्हिड-१९ संबंधित प्राथमिक आरोग्य केंद्र, बोधडी (बु) अंतर्गत थारा ता.किनवट जि. नांदेड येथे कोव्हिड-१९ विषाणूचा प्रादुभार्व व प्रसार रोखणेकामी गावपातळीवर सर्वेक्षण करणेबाबतदिनांक ०७/०४/२०२० ते दिनांक १४/०८/२०२० पर्यंत कोव्हिड-१९ कर्तव्यावर कार्यरत होते व दिनांक दिनांक २३/०८/२०२० रोजी श्री. गुरु गोविंदसिंगजी जिल्हा रग्णालय, नांदेड येथे दाखल झाले व दिनांक ३०/०८/२०२० रोजी मृत्यु झाल्याबाबत (१)गट विकास अधिकारी, पंचायत समिती, किनवट (२) गट शिक्षणाधिकारी,पंचायत समिती, किनवट (३) तहसिलदार किनवट यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) वडवळे यांची दि.२८/०८/२०२० रोजी केलेली कोव्हिड-१९ रॅपीड अँन्टीजन चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते.

६. कै.(श्री.) वडवळे हे सहाय्यक जिल्हाधिकारी तथा दंडाधिकारी किनवट यांचे दिनांक ०६/०४/२०२० च्या आदेशानुसार कोव्हिड-१९ संबंधित विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाय योजना व गावपातळीवर सर्वेक्षण करणे या कर्तव्याकरिता प्राथमिक आरोग्य केंद्र, बोधडी (बु) अंतर्गत थारा ता.किनवट जि. नांदेड येथे दिनांक ०७/०४/२०२० ते दिनांक १४/०८/२०२० पर्यंत कार्यरत असून दिनांक २३/०८/२०२० रोजी ते श्री. गुरु गोविंदसिंगजी जिल्हा रग्णालय, नांदेड येथे दाखल झाले असून त्यांचा दिनांक २८/०८/२०२० रोजीचा कोव्हिड-१९६ संबंधितचा रिपोर्ट पॉझिटीव्ह आला असून त्यांचा दिनांक ३०/०८/२०२० रोजी कोव्हिड संसर्ग आजारामुळे मृत्यु झाला आहे. त्यानुसार कै.(श्री.) वडवळे हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै.(श्री.) वडवळे यांचेवर दिनांक २३/०८/२०२० पासून ते दिनांक ३०/०८/२०२० या कालावधीत श्री. गुरु गोविंद सिंघजी स्मारक, जिल्हा सामान्य रुग्णालय, नांदेड येथे कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. दिनांक ३०/०८/२०२० रोजी कोव्हिड-१९ आजाराने मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे अति. जिल्हा शल्य चिकित्सक, श्री. गुरु गोविंद सिंघजी स्मारक, जिल्हा सामान्य रुग्णालय, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

८. कै.(श्री.) गुरव यांचा दिनांक ३०/०८/२०२० रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र निबंधक (जन्म व मृत्यु), जिल्हा रुग्णालय, नांदेड यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

९. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, नांदेड यांनी कै. (श्री.) वडवळे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) इंदूताई सखाराम वडवळे (इंदुताई गोविंदराव ढगे) (२) केदार सखाराम वडवळे (३) सुजित सखाराम वडवळे यांना घोषित केले आहे.

१०. कै.(श्री.) सखाराम गोविंदराव वडवळे, सह. शिक्षक केंद्रीय प्राथमिक शाळा, थारा, किनवट जि. नांदेड यांना २२०२ ०१७३-३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड व अति. जिल्हा शल्य चिकित्सक, श्री. गुरु गोविंद सिंघजी स्मारक, जिल्हा सामान्य रुग्णालय, नांदेड यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, नांदेड यांनी कै. (श्री.) वडवळे यांचे कायदेशिर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) इंदूताई सखाराम वडवळे (इंदुताई गोविंदराव ढगे) (२) केदार सखाराम वडवळे (३) सुजित सखाराम वडवळे यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र. ५८०/व्यय-५, दि.०२/०५/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्ष प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०५२२१८३९२१३३२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APPASING RAMSING RAJPUT

Digitally signed by APPASING RAMSING RAJPUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education and Sports, 2.5.4.20=81C03748EA91B5CA6EB76216FADD8CFC070967B2826BADC6BA66DC8151A5B97A, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02486C751E1117F7DF4BDEA131CC54D2A4486AA35E5AB82CE788466F2EC90916, cn=APPASING RAMSING RAJPUT
Date: 2025.05.22 18:40:11 +05'30'

**( आ. रा. राजपूत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), नांदेड

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती इंदूताई सखाराम वडवळे
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.०७/२०२४)